**केंद्र पुरस्कृत एकात्मिक गळीतधान्य व मका विकास कार्यक्रम(Integrated Schemeof Oilseed, Pulses, Oilpalm andMaize - ISOPOM) सन २०१० -११ मध्ये राबविण्यास प्रशासकीय व वित्तिय मान्यता देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : आयएसओपी -१६१०/ प्र.क्र.-१८४/४-अे,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :- ०५ ऑगस्ट , २०१०**

**संदर्भ:** **१) शासन निर्णय क्र. आयएसओपी -१६०९/ सीआर-३३/४-अे, दि. २४ जुलै, २००९, दि. २७ आक्टोंबर, २००९ व दि. १० मार्च, २०१०**
**२) केंद्र शासन कृषि मंत्रालय,कृषि व सहकार विभाग,नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक २-११/ २०१०-pul/ TMOP, दिनांक ३ जून, २०१०**
**३) शासन निर्णय समक्रमांक दिनांक २१ जून, २०१०**
**४) केंद्र शासन कृषि मंत्रालय,कृषि व सहकार विभाग,नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक No. 2-11 /2010 -Pul/TMOP, दि. २४ जून, २०१०**
**५) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. कृआ/ विप्र-२/ आयसोपॉम/प्रशा. वित्तीय मान्यता/३४३/१० दिनांक १३ जुलै, २०१०**

**प्रस्तावना :-**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय गळीत धान्य उत्पादन कार्यक्रम, राष्ट्रीय कडधान्य विकास कार्यक्रम व गतीमान मका विकास कार्यक्रम राज्यात सन १९९५-९६ पासून राबविण्यात येत आहेत. सन २००४-०५ पासून हे सर्व कार्यक्रम एकत्रित करुन केंद्र पुरस्कृत एकात्मिक गळीतधान्य कडधान्य, तेलपाम व मका विकास कार्यक्रम (Integrated scheme of Oilseed, Pulses, Oilpalm and Maize-ISOPOM) ही योजना, तेलपाम व सन २०१०- ११ पासून कडधान्य हे घटक वगळता अन्य घटकांसाठी राज्यात राबविण्यात येत आहे. कडधान्य या घटकाचा सन २०१०-११ या आर्थिक वर्षापासून राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान या योजने अंतर्गत समावेश करण्यात आला आहे. या योजनेच्या निधीत केंद्र व राज्य हिश्याचे प्रमाण ७५:२५ असे आहे.

२. केंद्रीय कृषि मंत्रालयाच्या संदर्भाधीन दिनांक ३ जून, २०१० च्या पत्रान्वये सन २०१०-११ मध्ये केंद्र पुरस्कृत एकात्मिक गळीतधान्य, कडधान्य, तेलपाम व मका विकास कार्यक्रम (Integrated Scheme of Oilseed, Pulses, Oilpalm and Maize-ISOPOM) राबविण्यास दिलेली मान्यता विचारात घेऊन सदर कार्यक्रम राज्यात सन २०१० -११ मध्ये राबविण्याकरिता **रु. ५४००.१४( रु. चौपन्न कोटी चौदा हजार फक्त)** लाखाच्या कार्यक्रमास संदर्भाधिन दि. २१ जून, २०१० च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापि, केंद्रीय कृषि मंत्रालयाने त्यांच्या संदर्भाधीन दिनांक २४ जून, २०१० च्या पत्रान्वये सदर

योजना सन २०१०-११ मध्ये राबविण्यासाठी रू. ८४२९.१६ लाख ( रूपये चौऱ्याऐंशी कोटी एकोणतीस लाख सोळा हजार फक्त ) कार्यक्रमास मान्यता दिली आहे. **त्यामुळे दि २१ जून, २०१० चा शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहे**. सदर योजना सन २०१० -११ मध्ये राज्यात राबविण्याकरिता केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार रू.८४२९.१६ लाख ( रूपये चौऱ्याऐशी कोटी एकोणतीस लाख सोळा हजार फक्त) कार्यक्रमास प्रशासकीय व केंद्र हिश्श्याच्या पहिल्या हप्त्यापोटी रू.२९३६.३६ लाख ( रूपये एकोणतीस कोटी छत्तीस लाख छत्तीस हजार फक्त ) कार्यक्रमास वित्तिय मान्यता देण्याची तसेच सदर योजने अंतर्गत कृषि आयुक्तालय स्तरावरून राबविण्यात येणाऱ्या बाबीसाठी रू. ४५०.०० लाख ( रूपये चार कोटी पन्नास लाख फक्त ) इतक्या निधीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१०-११ या वर्षासाठी केंद्र शासनाने त्यांचे संदर्भाधीन पत्र दिनांक २४ जून, २०१० अन्वये केंद्र पुरस्कृत "आयसोपाम" योजनेअंतर्गत एकात्मिक गळीत धान्य, कडधान्य व मका विकास कार्यक्रम राबविण्यास रू. ८४२९.१६ लाख ( रूपये चौऱ्याऐंशी कोटी एकोणतास लाख सोळा हजार फक्त ) इतक्या निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता दिली आहे. तसेच केंद्र शासनाच्या ७५ टक्के हिश्श्यामधील रू.२९३६.३६ लाख ( रूपये एकोणतीस कोटी छत्तीस लाख छत्तीस हजार फक्त ) कार्यक्रमास पहिल्या हप्ता म्हणून मुक्त केला आहे. **केंद्र शासनाची ही मान्यता लक्षात घेवून केंद्र पुरस्कृत"आयसोपाम" योजनेंतर्गत एकात्मिक गळीत धान्य, कडधान्य व मका विकास कार्यक्रम सन २०१०-२०११ मध्ये राबविण्याकरीता रू. ८४२९.१६ लाख ( रूपये चौऱ्याऐंशी कोटी एकोणतीस लाख सोळा हजार फक्त ) इतक्या निधीच्या कार्यक्रमास शासनाची प्रशासकीय व रू.२९३६.३६ लाख ( रूपये एकोणतीस कोटी छत्तीस लाख छत्तीस हजार फक्त ) कार्यक्रमास वित्तिय मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदर योजने अंतर्गत कृषि आयुक्तालय स्तरावरून राबविण्यात येणाऱ्या बाबीसाठी रू. ४५०.०० लाख ( रूपये चार कोटी पन्नास लाख फक्त) कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. राज्य हिश्श्याचा एकूण निधी ( आयुक्तालयस्तर + जिल्हा स्तर ) २५% पेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता संबंधितांनी घ्यावी.**

२. **या मंजूर निधीचे योजनानिहाय वितरण पुढीलप्रमाणे राहील.**

**(रुपये लाखात)**

| योजनेचे नांव | केंद्र हिस्सा |
|---|---|
| गळीत धान्य उत्पादन कार्यक्रम | २६५८.३६ |
| मका विकास कार्यक्रम | २७८.०० |
| एकूण | २९३६.३६ |

३.    या योजनेसाठी मंजूर केलेला रु. २९३६.३६ लाख निधी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०१०-११ च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**<u>केंद्र हिस्सा</u> (७५ % )**

**मागणी क्रमांक डी-३** **(रु. लाखात )**

| | | |
|---|---|---|
| **अ** | **२४०१, पीक संवर्धन ११४, तेलबियाणे विकास कार्यक्रम केंद्रहिस्सा (००) (०६ )एकात्मिक तेलबिया उत्पादन कार्यक्रम (२४०१-२४९८) ३३ अर्थसहाय्य** | **२२५८.३६** |
| **ब** | **२४०१, पीक संवर्धन ११४, तेलबियाणे विकास कार्यक्रम केंद्रहिस्सा (००) (१० ) तेलबिया विकास कार्यक्रम (२४०१-४६६१) ३१, सहाय्यक अनुदान** | **४००.००** |
| **क** | **२४०१ - पीकसंवर्धन १०२ , अन्नधान्ये पीके केंद्रहिस्सा (००) (२४ ) एकात्मिक मका उत्पादन कार्यक्रम ( २४०१ ४५६१ ) ३१ - सहाय्यक अनुदान,** | **६०.००** |
| **ड** | **२४०१ - पीकसंवर्धन १०२ , अन्नधान्ये पीके केंद्रहिस्सा (००) (१६ ) एकात्मिक मका उत्पादन कार्यक्रम ( २४०१ ३५८३ ) ३३ अर्थसहाय्य** | **२१८.००** |

४.    या योजनेसाठी कृषि आयुक्तालय स्तरावरून राबविण्यात येणाऱ्या बाबीसाठी मंजूर केलेला राज्य हिस्सा रू. ४५०.०० लाख निधी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०१० - ११ च्या मंजूर तरतूदीतून भागीवण्यात यावा.

**<u>राज्य हिस्सा</u> ( २५% ) ( केंद्र पुरस्कृत गळितधान्य विकास कार्यक्रम ) ( आयुक्तालय स्तर )**

**मागणी क्रमांक डी-३** **( रू. लाखात )**

| | |
|---|---|
| **२४०१, पीक संवर्धन ११४, तेलबियाणे विकास कार्यक्रम राज्य योजनांतर्गत योजना ( राज्य हिस्सा २५ टक्के ) (००) (०१ )एकात्मिक तेलबिया उत्पादन कार्यक्रम ( २४०१-१५३५ ) ३३ अर्थसहाय्य** | **४५०.००** |

५.    या प्रयोजनासाठी कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य ,पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच मंजूर निधीचे जिल्हानिहाय वितरण करण्यास त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. या योजनेचा खर्च मासिक कॅश फ्लोच्या मर्यादेत राहील याची त्यांनी दक्षता घ्यावी.

६.	केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भाधीन दि. २४ जून, २०१० च्या पत्रान्वये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनानुसार सन २०१०-११ मध्ये एकात्मिक गळीत धान्य व मका विकास कार्यक्रम राबविण्यात यावा. तसेच या योजनेकरीता केंद्रिय कृषि मंत्रालयाने त्यांच्या पत्र क्रमांक १४-३/०४(CA-II(KB) दिनांक २३ डिसेंबर, २००४ व दि. २४ जून, २०१० अन्वये दिलेल्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे कार्यक्रमांची अंमलबजावणी होईल याची दक्षता घेण्यात यावी.

७.	राज्य हिश्श्याच्या जिल्हा नियोजन व विकास समितीच्या अख्यत्यारितील तरतूदीस प्रशासकीय तसेच वित्तिय मान्यता संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडून देण्यात येतील.

८.	या कार्यक्रमाच्या उद्दिष्ट पूर्तीसाठी संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेवून उद्दिष्टनिहाय सविस्तर मार्गदर्शक सूचना सर्व क्षेत्रीय अधिका-यांना निर्गमित कराव्यात. या मार्गदर्शक सूचना निर्गमित करतेवेळी पुढील प्रमुख बाबी अंतर्भुत करण्याची दक्षता घेण्यात यावी.

i)	लाभार्थी निवडताना लहान व सिमांतिक शेतकरी, अनूसुचित जाती / जमाती व महिला लाभार्थी यांना प्राधान्य देण्यात यावे.

ii)	मंजूर निधीपैकी १६ टक्के निधी अनुसूचित जाती व ८ टक्के निधी अनुसूचित जमातीसाठी व ३० टक्के निधी महिला लाभार्थ्यांसाठी खर्च करण्यात यावा. याबाबतच्या नोंदी स्वतंत्रपणे ठेवण्यात याव्यात.

ii)	योजनेची अंमलबजावणी अधिक प्रभावी व परिणामकारकरित्या होण्याच्या दृष्टीने या योजनेंतर्गत प्रकल्पाधारीत विकास/ विस्तार कार्यक्रम (Projectised Development/ Extension Approach) राबविण्यात यावा.

iv)	प्रत्येक जिल्हयाचा विस्तार व फलोत्पादन आराखडा तयार करण्यात येत आहे. त्यामध्ये या योजनेचा अंतर्भाव गरजेनुरुप ठेवण्यात यावा.

v)	या योजनेचे मुल्यमापन त्रयस्थ यंत्रणेकडून (Third Party Evaluation) करुन घ्यावे.

vi)	वैयक्तिक लाभार्थी निवडताना महिला लाभार्थ्यांना प्राधान्य देण्यात यावे. असे लाभार्थी उपलब्ध नसल्यास, इतर लाभार्थींची निवड करण्यात यावी.

vii)	सन २००९- १० मध्ये लाभ घेतलेल्या व २०१०- ११ मध्ये वैयक्तिक लाभ दिलेल्या लाभधारकांची यादी तालुका कार्यालये / पंचायत समिती / जिल्हाधिकारी कार्यालयात लावण्यात यावी तसेच ती यादी विभागाच्या वेबसाईटवर देखील देण्यात यावी.

९.	केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे या योजनेचा आर्थिक व भौतिक प्रगतीचा मासिक अहवाल प्रत्येक महिन्याला ५ तारखेपर्यंत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल याची दक्षता घेण्यात यावी.

१०.   सदर शासन  निर्णय वित्त विभागाचा **अनौपचारिक संदर्भ क्र. १६० / १० / व्यय - १ , दि. ०३ ऑगस्ट, २०१० नुसार  व मा. अपर मुख्य सचिव ( कृषि व फलो. ) यांच्या मान्यतेने** निर्गमित करण्यात येत आहे.

१०.   हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक  २०१००८०६१६३०४५००१  असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( वि. मा. बिवलकर )**
**कार्यासन अधिकारी,  महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**प्रति,**

आयुक्त कृषि, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे
सर्व संचालक / सहसंचालक, कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे-१
विभागीय आयुक्त (सर्व)
जिल्हाधिकारी, (सर्व)
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
व्यवस्थापकीय संचालक, कृषि उद्योग विकास महामंडळ मर्यादित, आरे दुग्ध कॉलनी गोरेगाव (पूर्व), मुंबई-६५
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, शास्त्रीनगर, अकोला.
सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ /२, मुंबई / नागपूर
नियोजन विभाग (कार्यासन - १४३१ / कार्यासन - १४४४), मंत्रालय, मुंबई - ३२
वित्त विभाग  व्यय -१/ अर्थसंकल्प -१३
सामाजिक न्याय, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग / आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,  मुंबई-३२
ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई
सर्व सह सचिव / उपसचिव / अवर सचिव, कृषि व पदुम विभाग (कृषि व फलोत्पादन  प्रभाग)
मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (कृषि ) यांचे खाजगी सचिव /
निवड नस्ती